महाराष्ट्र राज्य भारत स्काऊटस् आणि गाईडस् या संस्थेस वेतनेतर अनुदान वितरीत करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग

## शासन निर्णय क्रमांकः पुमाप्र-२०२०/प्र.क्र.२१/क्रीयुसे-३,

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २७ मार्च, २०२०.

वाचा :-

१) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.एससीजी-२००७/प्र.क्र.१६/माशि-७, दिनांक २१ नोव्हेंबर, २००८.
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन शुद्धीपत्रक क्र.भास्कागा-३०१६/प्र.क्र.६८-क्रीयुसे-३ दिनांक ५ नोव्हेंबर, २०१६.
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. पुरक-२०२०/प्र.क्र.५४/अर्थ-३, दिनांक ११ मार्च, २०२०.

प्रस्तावना:-

महाराष्ट्र राज्य भारत स्काऊटस् आणि गाईडस्, मुंबई या संस्थेस वरील संदर्भाधीन क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये वेतनेतर बाबींकरीता रु.२४,०८,६५०/- (अक्षरी रु. चोवीस लाख आठ हजार सहाशे पन्नास फक्त) इतक्या रक्कमेच्या वार्षिक खर्चाकरीता मंजुरी दिली आहे. त्याअनुषंगाने एकुण २९७ गट-क व गट-ड संवर्गातील कर्मचाऱ्यांच्या वेतनेतर खर्चाकरीता मागील थकबाकी ( सन २०१२-१३ ते सन २०१७-१८ ) तसेच, चालु आर्थिक वर्षाकरीता खर्चासाठीची रक्कम धरुन रु.५७,२८,८६९/- इतक्या रकमेची आवश्यकता होती. त्याअनुषंगाने वित्त विभागास चालु वर्षी रु.५७,२८,८६९/- एवढया रकमेची तरतुद पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पीत करण्याच्या प्रस्तावास मान्यता देण्याची विनंती व्यय अग्रक्रम समिती व वित्त विभागास करण्यात आली होती. सदर वेतनेतर खर्चामध्ये कर्मचाऱ्यांचे उपदान व भविष्य निर्वाह निधी, मानद कार्यकर्त्यांचे मानधन, मेळावे इ. बाबींचा समावेश आहे.

## शासन निर्णय:-

महाराष्ट्र राज्य भारत स्काऊटस् व गाईडस्, मुंबई या संस्थेच्या आस्थापनेवर गट “क” व गट “ड” यांचे एकुण २९७ मंजूर पदे आहेत. या पदांवरील कर्मचाऱ्यांच्या उपदान व भविष्य निर्वाह निधी व अन्य वेतनेतर खर्चाकरीता उपलब्ध तरतूदीपैकी देय रकमा विचारात घेता खालील बाबींवरील खर्चाकरीता एकूण रू.४८,१७,३००/- (रू. अठ्ठेचाळीस लक्ष सतरा हजार तीनशे फक्त) इतकी रक्कम वितरीत करण्यास शासन मान्यता देत आहे.

| अ.क्र. | वेतनेत्तर अनुदान मान्य बाबी | आर्थिक वर्ष २०१८-२०१९ ची देय थकबाकी | आर्थिक वर्ष २०१९-२०२० करीता देय रक्कम |
|---|---|---|---|
| १. | प्रवास व दैनिक भत्ता | रू. ६,००,०००/- | रू. ६,००,०००/- |
| २. | उपदान व भविष्यनिर्वाह निधी | रु.३,८०,०००/- | रु.३,८०,०००/- |
| ३. | मानद कार्यकर्त्यांचे मानधन | रू. ६०,०००/- | रू. ६०,०००/- |
| ४. | जिल्हा संस्थांना अनुदान | रू. ३,९०,०००/- | रू. ३,९०,०००/- |
| ५. | कॉन्टिजन्सीज | रू. ३,७८,६५०/- | रू. ३,७८,६५०/- |
| ६. | मेळावे,शिबीर,चर्चासत्रे इत्यादी | रू. ३,००,०००/- | रू. ३,००,०००/- |
| ७. | स्काऊट-गाईड नियतकालिके | रू. ३,००,०००/- | रू. ३,००,०००/- |
| | एकूण | रू. २४,०८,६५०/- | रु.२४,०८,६५०/- |
| एकूण | | रू.४८,१७,३००/- (रू. अठ्ठेचाळीस लक्ष सतरा हजार तीनशे फक्त) | |

महाराष्ट्र राज्य भारत स्काऊट आणि गाईडस्, मुंबई या संस्थेच्या आस्थापनेच्या वेतनेतर बाबीवरील उपरोक्त खर्च आर्थिक वर्ष २०१९-२० मध्ये मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेला निधी वित्त विभागाने खर्चाचे पुरक विवरणपत्र -२०१९-२०२० या वित्तीय प्रकाशनामध्ये समाविष्ट केलेला आहे .

३. उपरोक्त बाबींवर होणारा खर्च मागणी क्र. ई-३, २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०२ विद्यार्थ्यांसाठी युवक कल्याण कार्यक्रम, (०२)(०१)बालवीर सेवा व मार्गदर्शन-महाराष्ट्र राज्य भारत बालवीर व वीरबाला, मुंबई यांना सहायक अनुदाने (अनिवार्य) (२२०४ ००३४) या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२०२० च्या सुधारीत अर्थसंकल्पीय अंदाजाद्वारे उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा. सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर केले आहे, त्याच प्रयोजनार्थ व त्याच आर्थिक मर्यादेमध्ये खर्च करण्यात यावे. सदर तरतुद वितरीत करताना खालील अटी व शर्तीचे पालन करण्यात यावे:-

१) उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा त्याच वेळी आहरीत करावा.

२) राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/नियम/ शासन निर्णय वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करुन वरील वितरीत तरतूदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३) वित्त विभागाचे दिनांक ०८.०७.२०१९ च्या परिपत्रकातील अटी व शर्तीचा भंग होणार नाही याची दक्षता घेऊन निधी वितरणास हरकत नसावी.

४. वित्त विभाग दिनांक ०८.०७.२०१९, ११.०३.२०२० व १३.०३.२०२० च्या परिपत्रकातील सूचनानुसार सदर तरतुद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी लेखाधिकारी, आयुक्त, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३२७१३३४४९५९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e1d6f07c5cabf5884958ee70015d36b35b2c07e9700fe62cba2439a81b4be4, cn=Swati Madhukar Nanal
Date: 2020.03.27 13:40:56 +05'30'

**( स्वाती म. नानल )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. सर्व विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य.
( क्रीडा संचालनालयामार्फत)
३. राज्य मुख्य आयुक्त, महाराष्ट्र राज्य भारत स्काऊटस् आणि गाईडस्, मुंबई.
४. राज्य चिटणीस, महाराष्ट्र राज्य भारत स्काऊटस् आणि गाईडस्, मुंबई.
५. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.
६. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.
७. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे. (क्रीडा संचालनालयामार्फत)
८. संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी ( क्रीडा संचालनालयामार्फत)
९. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत)
१०.वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई-३२.
११.अवर सचिव ( अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.निवड नस्ती (क्रीयुसे-३).